पुरवठा विभागातील पुरवठा निरीक्षक संवर्गातील सरळसेवेच्या वाटयाची पदे भरणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक : अस्थाप्र-१०१६/प्र.क्र.५०२/नापु-१५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ फेब्रुवारी,२०१७.

वाचा :- (१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक २.६.२०१५.
(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.२९०/का.१२, दिनांक १६.७.२०१५.

## -: परिपत्रक :-

पुरवठा विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयात रू.५२००-२०२०० (ग्रेडपे रू.२८००) या वेतनश्रेणीतील पुरवठा निरीक्षक संवर्गातील पदे मंजूर आहेत. पुरवठा निरीक्षक संवर्गातील पदे सेवा, पदोन्नती वा समकक्ष पदावरील कर्मचाऱ्यांच्या बदलीने भरण्याची तरतूद आहे. सरळसेवा व पदोन्नतीने भरण्याचे प्रमाण एकूण मंजूर पदांच्या ५०% इतके आहे. शासनातील कामाची निकड लक्षात घेता, सदर गुणोत्तर शिथील करण्याची तरतूद देखील सेवाप्रवेश नियमात आहे.

२. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, पुरवठा विभागातील पुरवठा निरीक्षकांची सरळसेवेच्या वाटयाचे पदे महसूल विभागातील समकक्ष पदावरील कर्मचाऱ्यांची नियुक्ती करून भरली जातात. परिणामी, पुरवठा विभागातील वरच्या पदावर जसे, निरीक्षण अधिकारी, सहाय्यक पुरवठा अधिकारी इत्यादींवर पदोन्नती देण्याकरीता खालच्या पदावर कर्मचारी उपलब्ध होत नाहीत.

३. कोकण, नाशिक, पुणे व औरंगाबाद या विभागात पुरवठा निरीक्षक संवर्गातील सरळसेवेच्या वाटयाची पदे भरण्यात आलेली नाहीत. त्यावर एकतर महसूल विभागातील कर्मचारी कार्यरत आहेत वा ती रिक्त आहेत.

४. कोकण, नाशिक, पुणे व औरंगाबाद या विभागातील पुरवठा निरीक्षकांची सरळसेच्या वाटयाची पदे भरण्यास परवानगी देण्याचा प्रस्ताव दिनांक २.६.२०१६ च्या शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या प्रधान सचिव (सेवा) यांच्या अध्यक्षतेखालील समितीसमोर दिनांक ४.२.२०१७ च्या बैठकीत सादर करण्यात आला होता. समितीने कोकण, नाशिक, पुणे व औरंगाबाद या विभागातील पुरवठा निरीक्षक संवर्गातील सरळसेवेच्या वाटयाची पदे भरण्यास मंजूरी दिलेली आहे. विभागवार सरळसेवेच्या वाटयाची रिक्त पदे व समितीने मंजुरी दिलेली रिक्त पदे यांचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| अ. क्र. (१) | विभागाचे नाव (२) | सरळसेवेच्या रिक्त पदांची संख्या (३) | भरण्यास मंजुरी दिलेल्या पदांची संख्या (४) |
|---|---|---|---|
| १) | कोकण | ९१ | २३ |
| २) | नाशिक | १२२ | ३२ |
| ३) | पुणे | १३९ | ३६ |
| ४) | औरंगाबाद | १०८ | २९ |

५. समितीने दिलेल्या मंजुरीनुसार पुरवठा निरीक्षक संवर्गातील सरळसेवेच्या वाटयाची वरील तक्त्यातील स्तंभ क्रमांक ४ मध्ये नमूद केलेल्या पद संख्येनुसार पद भरतीबाबत खालीलप्रमाणे सूचना या परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत :-

(१) समितीने मंजुरी दिलेल्या पदांवर भरती दिनांक १० मार्च,२०१७ पर्यंत करण्यात यावी. सदर भरती विहित पध्दतीने म्हणजे जाहिरात काढून करण्यात यावी.

(२) पुरवठा निरीक्षक संवर्गातील पदावर सरळसेवेने नियुक्त कर्मचाऱ्यांचा वापर केवळ पुरवठाविषयक कामकाजासाठी करण्यात यावा.

(३) सरळसेवेच्या वाटाच्या पुरवठा निरीक्षक संवर्गातील पदावर कार्यरत असलेल्या महसूल विभागातील कर्मचाऱ्यांना सरळसेवेचे उमेदवार हजर झाल्यानंतर महसूल विभागाकडे प्रत्यार्पित करण्यात यावे.

(४) उर्वरित सरळसेवेच्या वाटयाच्या पदावर महसूल विभागातील कर्मचाऱ्यांची नियुक्ती केवळ तात्पुरती व्यवस्था (Stop Gap Arrangement) म्हणून सुरु ठेवावी व शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २.०६.२०१५ नुसार खालून दिलेल्या प्रमाणात सरळसेवेच्या वाटयाची पदे भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२२८११०४१३०१०६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pradip Girdhar Chavan

Digitally signed by Pradip Girdhar Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supply Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46ad1667fce35440d37e8567cc278d78039b81154909a1162e319e905bd4e93b, serialNumber=f7e9a44534c5a6e0d2062d6f59ec690169fc00c18def69311f356364b1870337, cn=Pradip Girdhar Chavan
Date: 2017.02.28 11:07:24 +05'30'

( प्र. गि. चव्हाण )
शासनाचे अवर सचिव

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद

२) उपआयुक्त (पुरवठा), कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद.,

३) कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद या विभागातील सर्व जिल्हयांचे जिल्हाधिकारी,

४) कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद या विभागातील सर्व जिल्हयांचे जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी.

**प्रत, माहितीसाठी :-**

१) प्रधान सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.

२) उप सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.

३) निवडनस्ती/का.नापु-१५.